बदली
उपअभियंता (विद्युत)
सार्वजनिक बांधकाम विभाग.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१७/ प्र.क्र. ९९/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१.५.२०१७

# शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ सार्वजनिक बांधकाम विभागातील खालील अधिका-यांच्या नियतकालीक/प्रशासकीय कारणास्तव, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी बदल्या करण्यात येत आहेत.

**उप अभियंता (विद्युत)सार्वजनिक बांधकाम विभाग**

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री. सुनिल श्रीराम वाणी | कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग, अंतर्गत उप अभियंता वि. दादर विद्युत उप विभाग | कार्यकारी अभियंता (विद्युत), मध्य मुंबई विद्युत विभाग अंतर्गत उप अभियंता (विद्युत),, जे.जे. रुग्णालय विद्युत उप विभाग. |
| २. | श्री. प्रसन्न वामन नारखेडे | ठाणे विद्युत उप विभाग, ठाणे | कार्यकारी अभियंता (विद्युत), दक्षिण मुंबई विद्युत विभाग अंतर्गत उप अभियंता (विद्युत), मंत्रालय विद्युत उप विभाग. |
| ३. | श्री. काशिनाथ नागू नवाळे | स्वीय सहायक, कार्यकारी अभियंता उत्तर मुंबई विद्युत विभाग | कार्यकारी अभियंता (विद्युत), ठाणे विद्युत विभाग अंतर्गत उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग, ठाणे |

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| ४. | श्री. प्रशांत अविनाश दोडे | भोंगा विद्युत उप विभाग, मुंबई | कार्यकारी अभियंता (विद्युत), ठाणे विद्युत विभाग अंतर्गत उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग, कल्याण |
| ५. | श्री. उमरावसिंग मणिराम चव्हाण | स्वीय सहायक कार्यकारी अभियंता दक्षिण मुंबई विद्युत विभाग | उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग, सिंधुदुर्ग. |
| ६. | श्री. स.रा. पुजारी | मुख्य अभियंता,विद्युत विभाग, मुंबई कार्यालय | उप अभियंता विद्युत (स्वीय सहायक) कार्यकारी अभियंता (विद्युत), ठाणे |
| ७. | श्रीमती के.अ. देठे | मुख्य अभियंता, विद्युत विभाग, मुंबई कार्यालय | कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग, अंतर्गत उप अभियंता (विद्युत), दादर विद्युत उप विभाग |
| ८. | श्री. जी. पी. शुक्ल | कार्यकारी अभियंता (विद्युत), दक्षिण मुंबई विद्युत विभाग अंतर्गत मंत्रालय विद्युत उप विभाग. | कार्यकारी अभियंता (विद्युत), पुणे विद्युत विभाग अंतर्गत, उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग पुणे-२ (श्री. काटोटे यांच्या स्वेच्छा सेवा निवृत्तीनंतर रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ९. | श्री. श्रीनिवास सुर्यकांत गुजरे | कार्यकारी अभियंता (विद्युत), उत्तर मुंबई विद्युत विभाग, मुंबई उपनगर अंतर्गत उप अभियंता, वांद्रे (विद्युत) उप विभाग | उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग, सोलापूर |
| १०. | श्री. एस. के. पाटील | उप अभियंता विद्युत (स्वीय सहायक) कार्यकारी अभियंता (विद्युत), ठाणे | उप अभियंता (विद्युत), विद्युत उप विभाग, पेण |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता (विद्युत) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. उपरोक्त उप अभियंता (विद्युत) यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचन अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११६५२३५६८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.06.01 16:39:40 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर
२. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
३. अधीदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड/सिंधुदुर्ग/पुणे/सोलापूर

५. सर्व संबंधीत उप अभियंता (विद्युत) यांना मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या मार्फत.

६. मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) /मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.

८. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.